# 'अमेरिकेची वारी' - २

---------------------------------------------------------------------------------

**१ जून २०११ . बुधवार**

आज गाडी सर्विसिंगला द्यायची असल्यानं विनीत आठ वाजताच ऑफिसला घेऊन गेला . बाहेर पाऊस अस्ल्यानं घरीच बसून कामं करत बसलो . एक वाजताा तो गाडी परत घेऊन आला व बाईक घेऊन परत गेला . सायंकाळी मी प्रेरणा व ऋचा बाहेर पडलो . उद्या यलो स्टोन नॅशनल पार्कला जायचं असल्यानं दुकानांतून जाऊन बरीच खरेदी करून आलो . एका कार वॉशपाशी जाऊन आतून व्हॅक्यूमनं तर बाहेरून पाण्याच्या जोरदार फवा-यानं गाडी साफ करून आणली . ऋचा अगदी सराईतासारखी सगळीकडे वावरते . मी पण मस्तपैकी फवारा मारून गाडीला साबण वगैरे लावून पाहिला . मजा आली . रात्री जेवून लवकरच झोपी गेलो . उद्याची तयारी सुरू झाली आहे .

**२ जून २०११ . गुरूवार**

आज झकास उन पडलेलं असल्यानं सगळं आवरून दोघंही जण खाली बागेत चकरा मारून आलो . दुपारनंतर जायचं असल्यानं मग बॅगा भरल्या . दोघींनी मिळून खाण्यापिण्याच्या वस्तू बनवून घेतल्या . दुपारी सगळं आवरून डिकीत सामान टाकून विनीतला आणायला त्याच्या ऑफिसात गेलो . साडेपाच वाजता निघालो ते स्पोकेनला पोहोचेतो साडेदहा वाजून गेले होते . ऋचा व विक्रम आलटून पालटून दोन दोन तास गाडी चालवत होते . पेट्रीफाईड फॉरेस्ट पर्यंतचा रस्ता पूर्वीच बघितलेला असल्यानं नवा नव्हता . पुढं मात्र लांबलचक पसरलेली विस्तीर्ण माळरानंच होती .





हिवाळयात सगळीकडे बर्फच साचलेलं असतं . पण इतर वेळी इथं शेती केली जाते . त्याची अजस्त्र यंत्रं जागोजागी पहायला मिळाली . बाकी सगळा रखरखाटच होता . सिॲटल सोडल्यापासून हे फारच जाणवत होतं . बाकी प्रवास मजेतच झाला . सुपर ८ हया मोटेलमध्ये रात्रभर मुक्काम आहे . तिथं पोहोचेतो बरीच रात्र झाली . खोली तर झकासच मिळाली . मस्तपैकी झोपून गेलो . पण पोट थोडंसं बिघडलं असल्यानं शांत झोप मात्र लागली नाही .

**३ जून २०११ . शुक्रवार**

आठ वाजता नाष्टा उरकून निघालो . छान पोट भरल्यानं मस्तपैकी निघालो . दोघंही आलटून पालटून गाडी चालवत होते . तीनेकशे मैलांचा प्रवास झाला . वाटेत हॉटेलस व रेस्ट रूमसाठी व पेट्रोलकरिता थांबत होतो . छान रस्ते व तुलनेने कमी वाहतूक असल्यानं वेगात चाललो होतो . (न्यू जर्सीवरून नंदा पडते हयांचा फोन आला . ते तिथल्या महाराष्ट्र मंडळाचे पदाधिकारी आहेत . त्यांना रेडियोवरचा कार्यक्रम अतिशयच आवडला . इथं या . आपण मंडळात लाइव्ह करू यात असं म्हणाले) . चार वाजता यलो स्टोन परिसरात येऊन पोहोचलो . इडाहो राज्यात काल रात्रीच येऊन पोचलो होतो .



आज मोनाटा राज्यातून प्रवास झाला. वाटेत बरीच छोटी छोटी गावं लागली. अगदी चित्रात किंवा दिवाळीच्या किल्ल्यात मांडून ठेवावीत तशीच दिसत होती. गेल्या वर्षी खूपच बर्फ पडलं होतं. त्याचे ढिगारे अनेक जागी दिसत होते. पुढचे तीन दिवस स्वच्छ सूर्यप्रकाश असून फिरायला अगदी योग्य वातावरण आहे ही माहिती निघतानाच मिळाली होती. त्याच्या खुणा वाटेत दिसत होत्याच. थंड हवा व उन यामुळं रस्त्यावर मृगजळाचे लांबरूंद पटटे दिसत होते. सहा महिन्यांपूर्वीच ऋचानं हॉटेल बुक करून ठेवलं होतं. त्यामुळं तो ताण काहीच नव्हता. 'ब्रॅडिंन आयर्न इन' हया हॉटेलात छानपैकी मांडलेलं केबिन टाईप घरच असल्यानं मग बरोबरचं व इथल्या दुकानांतून खरेदी करून आणलेलं खाण्यापिण्याचं सामान ठेवून व ताजेतवाने होऊन तासाभरातच निघालो. अगदी किलोमीटर अंतरावरच पार्कचं प्रवेशद्वार आहे. हया दोघांचा वार्षिक पास असल्यानं कुठच्याही नॅशनल पार्कमध्ये त्यांना व कारमधल्या मंडळींना प्रवेश लगेच व सुलभ असतो.




आत पन्नासच्या गतीनंच वाहनं चालवायची असल्यानं सगळं छान आरामात बघता येत होतं. थोडं अंतर गेल्यावर बायसन नावाच्या प्राण्याचे कळपच चरताना दिसले. म्हशीसारखा बेढब असा प्राणी व कळप करून राहणारा. त्यांचीच वस्ती अधिक. अगदी रस्त्यांवरून फिरताना सुद्धा दिसतात. रस्ते ओलांडतात. त्यावेळी दोन्ही बाजूंची वाहतूक आपणहून थांबलेली असते. पुढचे दोन दिवस इतक्या मोठया संख्येने दिसले की त्यातली मजा व उत्सुकता बरीच कमी झाली. मग पुढं निघालो.



वाटेत गरम पाण्याचे झरे दिसले. जमिनीच्या पोटातून गंधकाचं ऊकळतं पाणी बाराही महिने बाहेर उसळत असतं. त्यांना गीझर्स असं म्हणतात. काही ठिकाणी बुडबुडे तर काही ठिकाणी उंच कारंजी असे कमी अधिक क्षमतेचे शेकडो गीझर्स हया परिसरात आहेत. त्यातला 'ओल्ड फेथफुल' नावाचा फवारा बरोबर नव्वद मिनिटांनी ऊंचच ऊंच उसळतो.



त्या जागी आम्ही पोहोचलो तेव्हा फवारा उडायला सुरूवात झाली होती. तिथं आजूबाजूला बरीच बाकं कायमच मांडून ठेवलेली होती. अजून पुष्कळच उजेड असल्यानं बरीच मंडळी आलेली होती. खूपच थंडी व बोचरे वारे असल्यानं गरम कपडे व ओव्हरकोट घालूनच वावरत होतो. शेजारी माहिती केंद्रे व उपहारगृहे पण होती. तिथं गेलो. गरमागरम चहा प्याल्यावर जरा बरे वाटले. घरी येईतो रात्रीचे साडेदहा वाजून गेले होते. मॅगी शिजवून जेवलो. झोपलो. दोन दिवस भटकायचेच आहे.

**४ जून २०११. शनिवार**

कालच्या मोटर प्रवासानं व फार दमल्यानं ऋचा व विनीत उशीरा उठले. आम्ही मात्र नेहमीच्या सवयीनं लवकर उठून आवरून बसलो. बाहेर स्वच्छ सूर्यप्रकाश होता. पण गाडीवरती छान बर्फ पडलेलं होतं. बोचरं वारं व थंडी पण होती. गरम कपडे घालून दोघं तासभर फिरून आलो. उद्यानाच्या बाहेर ही छोटीशी टुमदार वस्ती असून टूरिस्टांसाठीच खास वसवलेली आहे. इथलं सगळं सेटिंग बघून आपण एखाद्या वेस्टर्नपटातल्या खेडयात वावरतो आहोत असं वाटत राहतं. आमच्या हॉटेलचं नाव पण घोडयांच्या अंगावर उमटवायच्या शिक्क्याशी निगडीत असल्याचं समजलं. सकाळच्या उन्हात गरम कपडे घालून फिरत होतो. मागच्या आठवडयात इथं बर्फ पडलं असं तिथं एका घराबाहेर काम करणाऱ्या तरूणाकडून समजलं. तिथं फोटो वगैरे काढून तासाभरानं दोघे रूमवर आलो.




तोवर दोघं उठले होते. अंडा भुर्जीचा तगडा नाष्टा करून दहाच्या सुमारास सगळे निघालो. पार्कच्या प्रवेशद्वारापासून वीसेक कि. मी. रस्ता मॅडिसन नदीच्या काठानं जातो. तिथून पुढं दोन खूप मोठे असे वर्तुळाकार मार्ग नकाशावर दिसत होते. प्रत्येकी सुमारे दीडेकशे कि. मी. लांबीचे. जागोजागी प्रेक्षणीय स्थळं व निसर्गसौंदर्यानं नटलेले. दिवसभराच्या प्रवासाचे. आज एक पुरा करायचं ठरवलं. वाटेत बायसन मोठया संख्येने होते. माणसं जिथं थांबून दुर्बिणीतून काही बघत असत तिथं आम्ही थांबायचो. त्यांनी हेरून ठेवलेलं काही बाही आयतंच पहायला मिळायचं. ती मंडळी पण हौसेनं सगळं काही दाखवायची. देशोदेशीचे पर्यटक इथं पहायला मिळत होते. सकाळची प्रसन्न वेळ व छान उन्हं पडलेली. सगळेच फार छान व निसर्गदर्शनाच्या मूडमध्ये होतो.



एके ठिकाणी नदीच्या पलिकडच्या तीरावरती उंच ठिकाणी टेकाडावरती गरूड पक्षी बसलेला होता. तर पुढं अगदी रस्त्याच्या कडेलाच सिओटे नावाचा कोल्हयासारखा दिसणारा प्राणी जमीन उकरून आपलं खाणं शोधत होता. आजूबाजूला माणसं पाहताहेत याचं त्याला काहीच भान नव्हतं. तिथून निघालो ते वाटेत अनेक गीझर्स बघत व फोटो काढत काढत पुढं निघालो. विक्रमनं दिलेल्या मोबाईल फोनमध्ये अनेक सुविधा आहेत. त्या इथं आल्यावर शिकलो. ज्वालामुखीच्या छोटया मोठया खुणा इथं जागोजागी गीझर्सच्या रूपानं उरल्या आहेत. त्यातलं पाणी सतत उकळत असतं. त्यात जगणा-या सूक्ष्म जीवाणुंच्यामुळं ते पाणी स्फटिकासारखं निर्मळ दिसतं. त्याच्या आजूबाजूचे चुनखडीचे थर पिवळे दिसतात. पिवळेपणाच्या फिकट ते गडद अश्या छटा दिसतात म्हणून याचं नाव 'यलो स्टोन' नॅशनल पार्क.




तिथला ग्रॅंड प्रिझमॅटिक गीझर तर खास पाहण्यासारखा. त्याचा फोटो पार्कच्या वतीनं प्रकाशित होणा-या वर्तमानपत्राच्या मुखपृष्ठावरती छापलेला होता. तिथं खूप वेळ थांबून फोटो घेतले. हया सर्व परिसरात लाकडी रस्ते केले असल्यानं अगदी जवळ जाऊन पाहता आलं. ग्रॅंट व्हिलेजपाशी फॉरेस्ट रेंजरचं ऑफिस आहे. तिथं आजूबाजूला गेल्या हिवाळयात पडलेलं बर्फ अजून साचून राहिलेलं होतं. इथं खूपच छान माहिती व प्रदर्शन मांडलेलं आहे. तिथल्या दुकानातून पार्कशी संबंधित काही वस्तू विकत घेतल्या. इथून जवळच कॉंटिनेंटल डिव्हाईड नावाची पाटी असलेली जागा दाखवतात. तिथं जमिनीखालच्या प्लेटस एकमेकांवर घासून आदळत असतात. तिथून पुढं लेक व्हिलेज व फिशिंग ब्रिज पाहून एका विस्तीर्ण पसरलेल्या तळयाच्या काठाकाठानं पुढं निघालो. हया तळयाचं पाणी गोठलेलं होतं. गाडी सावकाशच चालवावी लागत होती.



कारण एखादा ससा किंवा हरीण वा पिटुकला प्राणी पटदिशी रस्ता ओलांडताना दिसे. पुढे कॅनियन व्हिलेजच्या वाटेवर पुष्कळ ठिकाणी थांबलो. एके ठिकाणी बरीच मंडळी मोठाल्या दुर्बिणी लावून काहीतरी बघत होती. इतर पर्यटकांना पण उत्साहानं दाखवत होती. खूप दूरवर एक ग्रिझली अस्वल चरत होतं. ते पहायला मिळालं. काही मंडळींचा हा छंदच असून हजारो डॉलर्स खर्च करून आपल्या साहित्यासह ही इकडं पडिकच असतात. पुढं चिखलाचे ज्वालामुखी बघितले. तेव्हा अंदमानला बघितलेल्या मड व्होलकॅनोजची आठवण आली.



कॅनियन व्हिलेजच्यापाशी एक मोठा धवधवा पहायला मिळाला. तोवर साडेसात वाजायला आलेले होते. पण बाहेर दुपार असावी असा उजेड होता. मग दीडेक तासात हॉटेलवर परतलो. दमलो होतो. स्टोअर मधून आणलेलं अन्न मायक्रोवेव्ह मध्ये गरम करून जेवलो. उद्या पहाटे उठून सुर्योदय पहायला जावं असा विचार आहे. पाहू या कसम जमतंय ते.

**५ जून २०११ . रविवार**

पहाटे उठून सुर्योदय पहायला जायचा संकल्प काही सिद्धीला जाऊ शकला नाही. मात्र मजबूत नाष्टा करून आठच्या सुमारास निघालो. आज वरचं वर्तुळ पूर्ण करायचं असून दमण्याची मानसिक तयारी करून ठेवलेली होती. मॅडिसन जंक्शनच्या पुढे वरच्या वर्तुळाकडे जाणारा रस्ता पकडून निघालो. वाटेत छोटे मोठे धवधवे, डोंगर कडे व गीझर्स व रेड इंडियनांच्या वस्तीचे अवशेष बघत उत्तरेकडे प्रवास करत निघालो. 'शीप इटर्स क्लिफ' पाशी कित्येक शतकांपूर्वीचे विशेष आकाराचे खडक पहायवास मिळाले. नॉरिस म्युझियम मध्ये खूप माहिती मिळाली. तिथं खूप मोठे गीझर्स आहेत.



मॅमथ हॉट स्प्रिंग्जच्या वाटेवरती काही ठिकाणं बघितली. एके ठिकाणी पुन्हा बरीच मंडळी रस्त्याच्या दोन्ही बाजूंना गाडया लावून उभी होती व काहीतरी दूरवर पहात होती. तिथं आम्ही पण थांबलो. फार दूरवर नदीपलिकडे डोंगराच्या मध्यावर अतिशक्तिशाली दुर्बिणी रोखलेल्या होत्या. बारकाईनं पाहिलं तरीही काही दिसत नव्हतं. पण दुर्बिणीतून पाहिल्यावर मात्र तिथलं थरार नाटय स्पष्टपणे पहायला मिळालं. तीन दांडग्या अस्वलांनी एका बिसन च्या पिल्लाचा बळी घेतला होता. दोघंजण एका दगडापाशी त्यावर ताव मारीत होते. तर तिसरं आहारल्यामुळं बाजूच्या बर्फावर जाऊन झोपलं होतं. इथून एवढया लांबून पण पाहताना त्याची भीषणता चांगलीच जाणवत होती.



शे दीडशे माणसं व शंभराच्यावर गाडया रस्त्याच्या दुतर्फा होत्या. पण एकीचाही हॉर्न वाजत नव्हता की माणसं मोठयानं आवाज करीत नव्हती. एका दुर्बिणीच्या मालकिणीला विचारलं की 'हे कसं लक्षात आलं?'. त्यावर ती म्हणाली, 'आम्ही नेहमीप्रमाणे बारकाइनं नजर ठेवून होतो. इतक्यात पलिकडच्या पठारावर हालचाल दिसली. दोन तीन काळे ठिपके वेगानं हलताना दिसले. तेव्हाच ही शिकार असल्याचं लक्षात आलं. बघितलं तर हया तिघा अस्वलांनी करडया रंगाच्या छोटया प्राण्याला घेरून जेरीस आणलेलं होतं. त्याला ठार करून मस्तपैकी ताव मारणं चालू होतं. प्रेरणानं तिचा कॅमेरा वापरून झूम करून काही फोटोपण काढले. किती वेळ बघत बसलो त्याचं भानही राहिलं नाही.



मोठया झ-यापाशी पोचेतो दुपारचे दोन वाजून गेले. मग तिथं थोडी पोटपूजा करून पुढे निघालो. टॉवर रूझवेल्टच्या वाटेवर असताना वाटेत एके ठिकाणच्या जंगलात एक अस्वलीण व तिची दोन पिले अगदी जवळून पहायला मिळाली. तिथं पण बरीच झुंबड उडालेली होती. पण अगदी शांत. दोन गोंडस पिल्लं मस्तपैकी खेळत होती. बागडत होती. इकडे तिकडे फिरून त्यांची आई लक्ष ठेवून होती.



टॉवर रूझवेल्टपाशी एक मोठा धवधवा होता. तो पाहून कॅनियन व्हिलेजकडे निघालो. तिथे पण बरेच प्राणी पहायला मिळाले. गर्दीच्या ठिकाणी समोरच्या डोंगरावर दोन मोठी अस्वले उन्हात वर्फापाशी खेळत होती. तर दुस-या एका जागी एक

अजस्त्र केसाळ अस्वल मजेत फिरत होतं . सायंकाळच्या उन्हामुळं त्याचं अंग पण चमकत होतं . परतीच्या वाटेवरती पुन्हा मघाशी बघितलेली मायलेकरं त्याच पाणथळ जागी वागडत होती . एक छोटं पिलू तर एका छोटया झाडाच्या पार शेंडयावर जाऊन बसलेलं होतं . त्यांच्या लीला आम्ही बघे फार दुरून न्याहाळत होतो . अमेरिकन मंडळी पण उत्तेजित होऊन 'ओ माय गॉड' वगैरे पुटपुटत होती . ते पिलू खाली उतरल्यावर मग ती तिघं घराकडे परतली . तोवर मंडळी डोळे ताणून बघत बसली होती . गेले दोन दिवस झक्कपैकी उन पडलं असल्यानं इतकी जनावरं बाहेर पडली असावीत . पुढचा रस्ता बंद असल्यानं आलो त्याच रस्त्यानं परतणं भागच होतं .



वाटेत मॅमथ हॉट स्प्रिंगच्या खालच्या लेव्हलवरचे गीझर्स बघितले . तिथं चुनखडीचे अनेक खडक व थर दिसले . हे सगळं होईतो साडेसात वाजून गेले होते . ओल्ड फेथफुलला जायचं ठरवलं होतं . तिथं पोहोचेतो साडेनऊ वाजून गेले . अर्ध्या तासानं पुढचा नजारा दिसणार होता . त्यामुळं बरोबर आणलेलं अन्न खाऊन घेतलं . माझं पोट जड असल्यानं मी फक्त चहा प्यालो .



बरोबर दहाच्या सुमारास शॉवर सुरू झाला . पाचेक मिनिटच होता . पण अगदी डोळयांचं पारणं फिटवणारा . अंधुकसा उजेड होता . पण त्यातही छान पहायला मिळालं . शंभरेक फूट ऊंच गरम पाणी उडत होतं . मग तिथून निघालो ते अकरा वाजता हॉटेलवर परतलो . खूपच दमलो असल्यानं मग पटदिशी झोपी गेलो . उद्या परतायचं आहे . दोन दिवस कसे गेले ते समजले नाही . सूर्यदेवाच्या कृपेने छान पहायला मिळालं .

**६ जून २०११ . सोमवार**

आठच्या सुमारास दूध पाव खाऊन निघालो ते अकरा तासांच्या प्रवासानंतर रात्री घरी आलो . वाटेत दोघंही आलटून पालटून गाडी चालवीत होते . खायला प्यायला पण थोडेफार थांबलो . जाताना हा रस्ता बघितला असल्यानं गाणी ऐकत व पुस्तक वाचत छान प्रवास झाला . हया झकास सफरीचे विचारच मनात येत होते . त्याची माहिती पत्रकं व पुस्तिका वाचत होतो . लाखो वर्षांपूर्वीच्या ज्वालामुखीचा हा परिसर . तिथून उडालेल्या राखेतूनच पश्चिम अमेरिकेची भौगोलिक जडण घडण झालेली आहे . १८७२ पासून इकडे राष्ट्रीय उद्यानची कल्पना साकारू लागली . आता १५० वर्षे होतील . माणसानं शेकडो मैल लांबीचे रस्ते बांधले . पशु पक्ष्यांची काळजी घ्यायचं मनावर घेतलं . हा वसा पुढच्या पिढयांपर्यंत पोहोचावा यासाठी योजना आखून त्याची अंमलबजावणी सुरू केली . हे सगळं खरोखरीच विशेष आहे . याचाच विचार प्रवासभर चालू होता . वाटेत स्पोकेन व सिॲटल मध्ये पण गरम हवा व टक्क उन होत . रात्री पिठलं भात खाऊन ऊशीरानं झोपलो .

**७-८ जून २०११ . मंगळवार / बुधवार**

प्रवासाचा छान शीण घालवण्यातच व आराम करण्यात दोन दिवस गेले . हवा पुन्हा पूर्वपदावरती आलेली होती . पाऊसच पडत होता . बोचरे वारे होते . संध्याकाळी थोडं उन पडलं . तेव्हा ऋचा आई व मी फिरून बाजारातनं सामान खरेदी करून आलो . बुधवारी पण हवा ढगाळच असल्यानं दिवसभर घरीच बसून होतो . सायंकाळी जरा उन पडल्यानं दोघं खालती बागेत फेरी मारून आलो . आज विक्रमचा फोन आला होता . ॲमेझॉन व आणखी एक दोन ठिकाणी नकार आल्यानं जरासा नाराजच होता .
नारायण सरदेसाई हयांचा फोन आला होता . त्यांची गंगौलींच्या कडे गाठ पडली होती . उद्याला सायंकाळी त्यांच्याकडे जेवायला आमंत्रण आहे .

**९ जून २०११ . गुरूवार**

आज सकाळच्या छान हवेमुळे दोघंही पार्कमध्ये पाच चकरा मारून आलो . बरेच दिवसांनी अशी संधी मिळाली होती . दुपारी विक्रमचा फोन आला . मागच्या आठवडयात 'एम फाऊंड्री' हया छोटया कंपनीत झालेल्या मुलाखतीचा निकाल आला होता . त्यांनी त्याला नोकरी देऊ केली आहे . ७० ते ७५ हजार डॉलर्स वर्षाला मिळतील असं म्हणाला . एकूण कालच्यापेक्षा आवाज बरा ऐकू येत होता . सायंकाळी विनीतच्या ऑफिसात जाउन मायक्रोसॉफ्टच्या दुकानात फेरी मारून आलो . पुष्कळ गोष्टी विकायला ठेवल्या होत्या . मग खाली बेलेव्हयूच्या डाऊनटाऊन मधल्या लायब्ररीत जाऊन मराठी विभागातनं तीन पुस्तकं घेऊन आलो . आवारात दोन वर्षांपूर्वीच महात्मा गांधींचा पुतळा बसवला होता . त्याची बातमी मी वाचली होती . तो आज प्रत्यक्ष पहायला मिळाला . रात्री ज्युरासिक पार्क सिनेमा पाहता पाहता मी एकीकडे माझी कामं करत बसलो .

**१० जून २०११ . शुक्रवार**

आज पण ढगाळच वातावरण होतं . अकरा वाजेपर्यंत वाचत लिहितच बसलो . दोघी जिम मध्ये गेल्या तर मी खाली बागेत एक चक्कर मारून आलो . दुपारी सरदेसाई हयांच्याकडे जायची थोडी तयारी केली . त्यांच्यासाठी दोन सी . डी . बनविल्या . सायंकाळी विनीत आल्यावरती चौघे सात वाजता निघालो . त्यांच्या घरी अगोदर ठरविल्याप्रमाणे साडेसात वाजता जाऊन पोहोचलो . कॉलनीच्या आवारात वाटच पहात फिरत होते . विस्तीर्ण तळयाच्या काठावरच त्यांचं अपार्टमेंट आहे . घरात नेण्याच्या अगोदर त्यांनी परिसरात थोडं फिरवून आणलं . सगळयांनाच आग्रहानं आत घेऊन गेले . ज्यूस, चिकन रोल वगैरे बायकोनं पटदिशी आणलं . ते पुण्याचे इंजिनियर व शिकायला इथं १९६४ साली आले . बोइंगमधून निवृत्त होऊन आता प्रोजेक्टवर इथं आले आहेत . एक ते पाच वर्षे राहण्याचा इरादा आहे . घर व मुलं नातवंडं डलासला असतात . मग तिघं गेल्यावरती आम्ही तिघं गप्पा मारत बसलो . संगीतापासूनच सुरूवात केली . रवी शंकर, जॉर्ज हॅरिसन, अलि अकबर खान हयांच्या काळापासून ते इथं आहेत . रमेश गंगोलींप्रमाणे त्यांनी पण संगीताची आवड असल्यानं इथं संस्था ऊभारल्या . महोत्सव आयोजित केले . अनेक मोठमोठे कलाकार त्यांच्याकडे मुक्काम करून गेले आहेत . त्याच्या अनेक आठवणी दोघांनी सांगितल्या . मग बरोबर नेलेल्या सी . डी . ज त्यांना दिल्या . वसंतरावांची व भीमसेनजींची व्हिडियो बघून अतिशयच खूष झाले . वसंतराव त्यांचे खास आवडते .




मग छानपैकी गप्पा मारतच साधंच पण रूचकर जेवलो. साडे अकरा वाजता निघालो. घरापर्यंत सोडायला आले होते. येताना त्यांनी तीन पुस्तकं आग्रहानं झोळीत टाकायला लावली. घरात व परिसरात सगळे चिडीचूप झालेले होते. मग मला बाहेरच सोडून ते दोघे परत गेले. वर जरा आवाज येत होता. त्यामुळे झोपायला उशीर झाला.

**११ जून २०११ . शनिवार**

आज हवामान तसं पावसाळीच असल्यानं मग दिवसभर सगळेच घरी होतो. विनीत त्याची कामं करत बसला. ऋचा जिममध्ये तर आम्ही दोघं बागेत पाच चकरा मारून आलो. सुटी असल्यानं व पाऊस पडत नसल्यानं बागेत मोठीच झुंबड ऊडालेली होती. जेवून थोडा आराम करून मग दुपारी चौघे निघालो ते विद्यापीठाच्या परिसरात फेरफटका मारून आलो. तिथं आज पदवीदान समारंभ असल्यानं विद्यार्थी व पालकांची एकच झुंबड ऊडालेली पहावयाला मिळाली.



खास पदवीदान समारंभाच्या वेळी घालावयाच्या पोशाखात तरूण तरूणांचे जथे अत्यंत उत्साहानं इकडून तिकडे फिरत होते. इथं आल्यापासून प्रथमच इतक्या मोठ्या संख्येनं इथले नागरिक रस्त्यावरून फिरताना बघितले. त्यांच्यातच मिसळून फोटो वगैरे काढत आवारात फिरलो. देशोदेशीचे पालक आपल्या मुलामुलींचं कौतुक करायला व पहायला आवर्जून आलेले होते. त्यात चिनी, कोरियन व जपानी फार मोठया प्रमाणावर दिसत होते. एक मराठी आवाज पण ओझरता ऐकायला मिळाला. पण कोण आहे ते बघेतो ती मंडळी पुढं निघून गेलेली होती. खूप स्वच्छ व कडक उन पडलं असल्यानं फिरायला पण मजा आली. खाली युनिवर्सिटी व्हिलेज मध्ये एक चक्कर मारून आलो. विद्यार्थ्यांसाठी सगळया गोष्टी एका जागी मिळायची चांगली सोय केलेली आहे इथं. विनीतचा भाऊ उथेच शिकायला होता.



विनीत पण काही महिने इथं होता. त्यामुळं त्याला हया परिसराची चांगलीच माहिती आहे. आठ वाजता घरी आलो. आता पुढच्या आठवडयातल्या कार्यक्रमाचे वेध लागले आहेत. मुकुंद मराठे हयांच्याशी मेल संपर्क सुरू झाला असून एकूणात तिथं पण छान माणसं भेटणार अशी लक्षणं दिसताहेत. सरदेसायांनी दिलेलं अपर्णा वेलणकरांचं 'फॉर हिअर ऑर टू गो' हे विलक्षण पुस्तक

वाचायला घेतलंय.१९६० च्या दशकात इथं आलेल्या पहिल्या मराठी पिढयांचं तटस्थपणानं केलेलं निरिक्षण हयात नोंदवलेलं आहे.ते वाचतच बराच वेळ बसलो.उशीरा झोपालो.उद्या हवा ठीक असणार आहे.त्यामुळे मग लांब जायचा विचार आहे.

**१२ जून २०११.रविवार**

आज हवामान ठीक असणार असल्यानं कास्केड नॅशनल पार्कमध्ये फिरून यायचं ठरवलं.सुमारे पाचशे मैलांचा प्रवास असल्यानं साडेसात वाजताच सगळे आवरून निघालो.नेहमीप्रमाणे दोघांनी मिळूनच गाडी चालवली.आता रस्ता बराचसा सवयीचा झालेला असल्यानं मी बाहेर पाहता पाहता सरदेसायांकडून आणलेलं पुस्तक 'फॉर हिअर ऑर टू गो' वाचत बसलो.खूपच अभ्यासपूर्ण आहे.२००७ साली सिॲटलच्या संमेलनात त्याचं प्रकाशन झालं.कुमार केतकरांनी त्याच्यावर लोकसत्तेच्या लोकमुद्रा सदरात लेख लिहिल्याचं आठवत होतं.आज अचानक इथं हे पुस्तक वाचायला मिळालं.आता त्याच परिस्थितीतून आम्ही व मुलं जाणार असल्यानं हे पुस्तक वाचताना सारखे डोळे भरून येत होते.वाचता वाचता सात लाख एकर जागेत पसरलेलं हे राष्ट्रीय उद्यान कधी जवळ आलं ते समजलं पण नाही.समोरच बर्फानं भरलेले डोंगर पाहून उत्तराखंड हिमालयाची सारखी आठवण येत होती.सातेक हजार फुटांवरती ही जागा असून अनेक तळी व नद्या आहेत.



त्यांच्यावरती जागोजागी धरणं बांधून पाणी अडवलेलं आहे.हायड्रोथर्मल पॉवर स्टेशन्स पण जागोजागी आहेत.तिथून सिॲटल शहराला थोडीफार वीज पण पुरविली जाते.इथं पण रस्ते फार सुरेख बांधलेले असून वेगानं वाहतूक चालू असते.अनेक ठीकाणी थांबून सृष्टी सौंदर्य पाहून पुढे निघालो.वाटेत जंगलातून चालायचा एक ट्रेल पण केला.मग खूप लांबचा रस्ता पकडूनच माघारी जायचं ठरवलं.



ऑलिंपिक व यलो स्टोन पेक्षाही इथं गर्दी कमी आढळली व खूप वेगळं पण वाटलं.बारा तासांच्या हया मस्त ट्रिपमध्ये येताना सफरचंदांच्या विस्तीर्ण बागा पण रस्त्याच्या दुतर्फा बघावयास मिळाल्या.वाटेत एका मेक्सिकन हॉटेलात जेवलो.



आइस्क्रिम घेतलं.ते इतकं होतं की मला बळेच संपवावं लागलं.सायंकाळी परतीच्या वाटेवरती एका जर्मन पद्धतीनं उभारलेल्या खेडयात फेरफटका मारून आलो.सुटी असल्यानं इथं पण खूपच मंडळी जमली होती.मजा आली.



बरीचशी भारतीय मंडळी पण दिसत होती.दिवसभर कडक उन असल्यानं स्वेटर पण घालावा लागला नाही.परतताना मात्र थोडा पाऊस लागला व गार वारं पण सुटलं होतं.खूपच थकलो होतो.पण बराच वेळ झोप लागली नाही.

**१३ जून २०११ सोमवार**

आज पण सकाळी भरून आलेलं होतं.पण थोडंसं उन पडल्यावरती मग खाली एक छान चक्कर मारून आलो.उद्याची तयारी करत बसलो.सॅन होजेसाठी भीमसेनजींवर कार्यक्रम बनवला होता.तो.सी.डी. व पेन ड्राइव वरती भरून घेतला.दुपारी आवरून उद्याच्या प्रवासाच्या बॅगा भरल्या.सायंकाळी सुबोध कीर्तने घ्यायला आले.त्यांच्याबरोबर समामीश विभागातल्या एका घरात गेलो.दोन तीन मराठी मंडळी जमली होती.



त्यांच्यापुढं 'पूर्वसुरींचे सूर' हा कार्यक्रम केला.बोडस काका नावाचे इथले दर्दी व जाणकार रसिक आवर्जून आलेले होते.टी.आय.एफ.आर.मधल्या राजीव भालेरावचा चुलत भाऊ व त्याची बायको पण आवर्जून आलेले होते.दोन तास छान रंगला.सुरेख जेवण पण झालं.साडेदहा वाजता कीर्तिनेनं पुन्हा आणून सोडलं.प्रेरणानं पण प्रथमच ऐकला होता व तिला पण आवडला.उद्या लवकर उठून जायचं असल्यानं शेवटी आटोपावा लागला.खूपच थकायला झालं होतं.पण बराच वेळ झोपच आली नाही.

**१४ जून २०११ मंगळवार**

पहाटेच जाग आली.त्यामुळे मोबाइलवरच गाणी ऐकत पडून राहिलो.सात वाजता विनीतनं आम्हा तिघांना विमानतळावती आणून सोडलं व तो कामावर गेला.आठच्या साऊथ वेस्ट एअरलाइन्सनं निघून मग सॅन होजेला आलो.सामान घ्यायला आलो तिथं विक्रम आलेला होता.मग समोरच्याच कार रेंटल मधून एक कार भाडयानं घेऊन निघालो ते विक्रमच्या खोलीवरती आलो.छान होस्टेलची रूम आहे.




तो आता चार दिवस आमच्याबरोबरच राहणार असल्यानं बॅग घेऊन निघाला.मग त्याच्या युनिवर्सिटीत एक चक्कर मारून आलो.त्याचे वर्ग वगैरे बघितले.मग अकरा मैलावरच्या 'सर्वण्णा' हया उडुपी रेस्टॉरंटमध्ये जाऊन इडली डोसे खाऊन हॉटेलवर चेक इन करायला आलो.खूपच दिवसांनी अस्सल मद्रासी पदार्थ खायला मिळत होते.आज दिवसभर खूपच उन असल्यानं गरम होऊन खूप उकडत पण होतं.अगदी मुंबईतल्यासारखंच वातावरण इकडे होतं.तीनच्या सुमारास मुंकुंद मराठे हयांना फोन केला.




संध्याकाळी घ्यायला येतो म्हणाले.मग मी रूमवरच राहून थोडी झोप घेतली तर तिघेजण सॅन फ्रान्सिस्कोला जाऊन आले.आठ वाजता मराठे न्यायला हॉटेलवरती आले.गावाबाहेर बरंच दूर त्यांचं घर होतं.वाटेनं गप्पा मारत होतोच.मूळ मुंबईचेच.कॉमर्स

शाखेचे. इथं येऊन एम.बी.ए.केलं. प्रकाश भालेराव हयांच्या एका कंपनीत काम करतात. भारतीय टी.व्ही.चॅनल इंटरनेटवरून इकडे दाखवावयाच्या कामात गुंतलेल्या कंपनीत काम करतात. त्यांच्या घराबाहेरच प्रकाश व सुजाता भालेराव भेटले. थोडया वेळानं विवेक दातार, जोगळेकर व आणखी एक जोडपं आलं. संगीताच्या ओढीनं ही माणसं एकत्र आलेली. त्यांचेशी मनमोकळया गप्पा व गाणी ऐकणं व ऐकवणं झालं. अरूण भालेराव हा भन्नाटच माणूस. त्यांच्या व्यवसाय व संगीतप्रेमाच्या अनेक नव्या गोष्टी संवादांतून समजल्या. पूर्वसूरींचे सूर व उद्याच्या कार्यक्रमाचे प्रोग्रॅमस मराठे हयांच्या लॅपटॉपवरती अपलोड करून ठेवले. त्याविषयी थोडी चर्चा केली. जुनी गाणी ऐकून अपेक्षेप्रमाणे मंडळी हरखून व हरवूनच गेली. वेळ कसा पटापट गेला ते समजलेच नाही. मराठे सोडायला आले. ते स्वतः हार्मोनियम वाजवतात. ठाण्याचे असून इथं सिसकोमध्ये काम करतात. विक्रमविषयी विषय निघाला होताच. तो तिथंच इंटर्नशिप करतोय असं समजल्यानं त्याला शोधून काढतोच म्हणाले. हॉटेल रूमवर येईतो अकरा वाजायला आले होते. ही मंडळी येईतो जवळ जवळ बारा वाजून गेले होते. खूपच दमून गेलेली होती. पटदिशी झोपी गेली.

**१५ जून २०११ बुधवार**

रोजच्यासारखी साडेपाच वाजताच जाग आली. काल खूप दमल्यानं व आज भरपूर फिरायचं असल्यानं तिघं झोपूनच होते. मी उठून गाणी ऐकत व लिहित वाचत बसलो. मग आठच्या सुमारास मी व विक्रम खाली जाऊन मजबूत नाष्टा करून आलो. विक्रम त्याच्या कॉलेजच्या कामाकरिता गेला. हया दोघींचं आवरल्यावरती ब्रेकफास्ट करून अकराच्या सुमारास सगळे निघालो. विक्रमला त्याच्या घरापासून पिकअप करून आजच्या टूरला निघालो. इथं जवळच सांता क्रूझ हया ठिकाणापाशी एक ‘मिस्टिक स्पॉट’ म्हणून जागा आहे. तिथं बाराच्या सुमारास जाऊन पोहोचलो.






पृथ्वीच्या चुंबकीय क्षेत्राचा काही असमतोल निर्माण झाला असून त्यामुळे विशिष्ट भागात गुरूत्वाकर्षणाच्या विपरित काही गोष्टी तिथं घडत असतात. गाईड बरोबरची पंधरा मिनिटांची टूर केली. एका लाकडाच्या केबिनमध्ये खरोखरीच काही विचित्र गोष्टी दिसतात. गुरूत्वाकर्षणाच्या विपरित असं काही तिथं अनुभवायला मिळतं. प्रेक्षणीय स्थळ म्हणून अनेक वर्षे लोक भेटी देतच आहेत. घनदाट जंगलात निसर्गरम्यस्थळी छान जागा आहे.





मग तिथून निघालो ते सेवन्टीन माईल ड्राइव्ह हया जागी ऐंशी मैलांचा प्रवास करून पोहोचलो. एवढया मोठया व विस्तीर्ण परिसरात वीसेक प्रेक्षणीय स्थळं पाहण्यासारखी आहेत. पंधराव्या शतकात शोध लागलेल्या हया प्रदेशात आता छान पर्यटन स्थळ विकसित झालेलं आहे. एका बाजूला टेकडी. तिथं भलीथोरली गोल्फची मैदानं. तर खालच्या बाजूला मोठाच सागरकिनारा. अगदी

अंदमानचीच आठवण करून देणारा. हया सतरा मैलांच्या लांबलचक प्रवासात जागोजागी टुरिस्ट स्पॉटस उभारलेले असून अतिशय आकर्षक नावं दिलेली आहेत. गाडीत बसूनच सैर करायची व जागोजागी उतरून स्थळदर्शन करून यायचं. थोडा वेळ मी व विक्रम उतरून फिरून आलो. पण उन्हाचा कडाका वाढू लागला तसे मग गाडीतच बसून बघत बसलो. हया दोघी मात्र प्रत्येक बारीक सारीक स्पॉटवरती उतरून बघायला धावायच्या. अगदी आमच्या अंदमानच्या सहलीचीच आठवण आली. तिथं पण मी व विक्रम एकदम आरामातच असायचो. पुढे एके ठिकाणी सी लायन नावाचे प्राणी किना-यावरती लवंडलेले होते. ते पहायला मात्र उतरलो. साडेपाच वाजता तिथून निघालो.



ऐंशी मैलांचा प्रवास करून बरोबर सात वाजता हॉटेलवरती पोहोचलो. थोडा ताजातवाना होत होतो तोच मुकूंद मराठे घ्यायला आले. गाडीत त्यांनी त्यांच्या संस्थेची व कामाची बरीच माहिती दिली. जुन्या अर्काइव्हल कामात हया मंडळींनी बरंच काम केलेलं आहे असं दिसतंय. रूद्रा व्हिडियोवरती 'सूर्य पाहिलेला माणूस', 'तेंडूलकरांच्या नाटकातली हिंसा' व किशोर कदमचा 'आनंद ओवरी' कार्यक्रम हे सगळं व्हिडियोवर आणण्याच्या कामात हया मंडळींचा मोठाच वाटा आहे. कला हया नाटकवेडया मंडळींच्या हया संस्थेने अनेक मराठी नाटकंपण बसवली आहेत. आठच्या थोडं अगोदरच सनातन धर्म आश्रमाच्या हॉलवरती जाऊन पोहोचलो. मंडळी येऊन साहित्य मांडायच्या मागं लागलेली होती. मराठे दातार वगैरे मंडळींच्या घरची माणसं व स्त्रिया मुली पण जातीनं कामात सहभागी होत असलेली पाहून अगदी सोलापूरकरांचीच आठवण येत होती. सव्वा आठ वाजता गुरूवात झाली. त्यामुळे काही व्हिडियोज अर्ध्याच दाखवाव्या लागल्या. पण एकूण माझी निवड व 'प्रवाद पुरूष भीमसेनजी'ही स्टोरी लाईन मंडळींना फारच आवडली. सुरूवातीला मराठीतून बोला असं मंडळी म्हणाली खरी. पण काही तरूणांनी इंग्रजीचा आग्रह धरल्यामुळं मग हा अनोखा प्रयोग करावा लागला. मराठीतून स्लाईडस, गाणी मराठी कानडी व हिंदीतून व माझं निवेदन इंग्रजीतून अशी मजा होती. दहा वाजेपर्यंत छान रंगला. एकही जण उठून गेला नाही. संयोजक मुकुंद मराठे हयांनी समारोपात खूप कौतूक करून सादरीकरण बहारीचं झालं असं सांगितलं. श्रोत्यांमध्ये सर्वच वयोगटाची मंडळी होती. बायका पुरूष व मुलं पण. त्यांना आया कानात काही खास गोष्टी समजावून सांगत होत्या. नागपूरचे श्री. धनंजय नानिवडेकर होते. २००१ मध्ये त्यांची व माझी मुलाणींकडे दिवाळीच्या दिवशी गाठ पडली होती. त्यावेळी रमेशपण माझ्याबरोबर होता. त्याची त्यांना अजूनही आठवण होती. माझी कॉमेंटरी व एकेक दुर्मिळ गाणी हयांच्यामुळे फारच छान नातं जमून आलेलं होतं. ते त्यांच्या दाद देण्यावरून व चेहेरा व त्यावरील पसंतीच्या हावभावांवरून समजत होतं. व्हिडियोमुळं खूपच मजा आली. त्यांनी वितरित केलेली तेंडुलकरांच्यावरची डी. व्ही. डी. व मानधनाचं पाकिट दिल्यावर कार्यक्रम संपला. पुष्कळ श्रोत्यांनीपण मुद्दाम भेटून तुमच्या निवेदनाचं ट्रान्सक्रिप्ट मिळेल काय असं विचारलं. श्रोत्यांनी दिलेली उत्स्फूर्त दाद ऐकून संयोजक पण सुखावले. अश्या प्रकारचा कार्यक्रमाच्या यशस्वीतेची आम्हालाच खात्री नव्हती म्हणाले. मग मला घरी सोडून मराठे गेले. हे तिघेजण बोर्डवॉकसाठी गेले होते ते उशीरा परतले. ऋचा व विक्रमची काही वादावादी झाल्यानं हवा एकूणात गरमच होती. त्यातून जेवायला न मिळाल्यानं आणखी वैतागले होते. मला पण भूक नव्हतीच. झोपलो.

१६ जून २०११ गुरूवार

आठ वाजल्यानंतर दोघे उठले. मी व प्रेरणा सकाळी लव्कर उठून बाहेर एक लांबलचक चक्कर मारून आलो. आज सॅन फान्सिस्कोला जायचं ठरवलं. खालती मजबूत नाष्टा करून आलो. आज पुन्हा विक्रम व ऋचाची तणातणी झाली. तो जरा बेफिकीर व बेपर्वा आहे असा ऋचाचा आरोप तर ती उठसूठ बॉसिंग करते त्यामुळे विक्रमला राग. मग चिडाचिडी व रडारडी

झाली. साडेअकराच्या सुमारास जरा शांतताा झाल्यावर मग निघालो. मी डोळे मिटून मागच्या सीटवरती विचार करत पडून राहिलो. अपर्णा वेलणकरच्या अलिकडेच वाचलेल्या पुस्तकाची सारखी आठवण येत होती. घराबाहेरची स्वतंत्रतेत गेलेली दोन वर्षे एकटेपणा व सर्वप्रकारचे ताण हयामुळे साचलेलं सगळं आईबापांचा सहवास मिळताच बाहेर पडतंय की काय? असं मनात आलं. का कुणास ठाऊक पण वरचेवर डोळे भरून मात्र येत होते. मुक्कामावर पोहोचेतो डोळे मिटूनच होतो. उघडले तेव्हां गोल्डन ब्रिजपासच्या भव्य पुलापाशी पोहोचलो होतो.



मग त्या पुलावरून चालत जाऊन तो डोळे भरून बघितला. सकाळच्या भांडणाचं मळभ आता पार दूर झालेलं होतं. तिथून मुईर वुडस नावाच्या जंगलात जाऊन आलो. रेडवूड जातीच्या हया प्रचंड मोठया व पुरातन झाडांच्या गर्द जंगलात फेरफटका मारून आलो. आज कामाचा दिवस असून देखील खूपच गर्दी होती. पहिल्यांदा पार्किंगच मिळालं नाही. पण मग जवळच्या एका बीचवरती जाऊन आल्यावरती मात्र तीनच्या नंतर जागा मिळाली.



तिथून निघेतो चार वाजून गेले होते. मग डाऊन टाऊनमध्ये लोंबार्ड स्ट्रीटवर गेलो. त्या भागातले सगळेच रस्ते उंचसखल आहेत. मात्र हया रस्त्याचा उतार जवळ जवळ सत्तर अंशांचा कोन करून आहे. वरच्या बाजूला गाडी पार्क करून तो उतार बघायला मंडळी खाली जाऊन पुन्हा वरती आली. मग पुन्हा गाडीत बसून सावकाश तो रस्ता उतरून खाली आलो.



ऋचा आता अगदी सराईतासारखी गाडी चालविते . मग एक दोन भारतीय उपहारगृहे शोधली . पण बंद होती . मग टू पीक पॉईंट पाहून परतीच्या वाटेवर लागलो . हया उंच डोंगरावरती भणाणतं वारं आहे . पण वरून शहराचा देखावा फारच सुंदर दिसतो .



मग सॅन होजेला आल्यावरती पंजाब कॅफे हया विक्रमच्या घरामागच्या हॉटेलात मस्तपैकी जेवलो . दमलो असल्यानं पटदिशी झोप लागली . उद्या दिवसभर प्रवासच आहे . सिॲटलच्या महाराष्ट्र मडळाच्या मंडळींशी मेलवरून संपर्क चालू आहे .

**१७ जून २०११ शुक्रवार**

सगळे आठच्या पुढे जागे झाले . मी मात्र साडे पाच वाजताच उठून बसलो . विक्रम जॉगिंग करून व युनिवर्सिटीच्या जिममध्ये जाऊन नऊ वाजेपर्यंत परतला . तोवर बॅगा वगैरे भरून आम्ही तयार झालो . खाली नाष्टा वगैरे करून मग वर आलो . ज्योतीला मुंबईत फोन लावला . ती देवीदास व संविद तिच्या अकरावीच्या प्रवेश अर्जासाठी कुलाब्याच्या घरी आले आहेत . नेमका फोन लागला तेव्हा सगळे आतल्या खोलीचं दार लागल्यानं अडकले होते . त्यांना कसं उघडायचं ते सांगितलं . उघडल्यावर त्यांच्याशी पुन्हा फोन पण झाला . मुंबईतली कामं आटोपून उद्या परत जायचे आहेत . संविद पुढच्या आठवडयात परत यायची आहे . मग हॉटेल एरिना सोडून अकरा वाजता निघून विक्रमच्या खोलीवरती आलो . त्यानं सॅक वगैरे घेतली . विमानतळावर गेलो . भाडयानं घेतलेली मोटार गाडी परत केली .



साडेबाराच्या यू . एस . एअरवेजच्या विमानानं दीडेक तासांचा प्रवास करून ॲरिझोना राज्यातल्या फिनिक्स हया ठिकाणी आलो . दोन तास थांबल्यावरती तिथून एक छोटं विमान पकडून फ्लॅगस्टॅग नावाच्या ठिकाणी आलो . हे शहर ग्रॅंड कॅनियनचं एक प्रकारे प्रवेशद्वार असून पर्यटकांची सततची वर्दळ चालू असते . तिथं एक गाडी दोन दिवसांसाठी भाडयानं घेऊन मग एका मॉटेलवरती आलो .



थोडे ताजेतवाने होऊन मग गावात एका इंडियन हॉटेलात खायला गेलो. थोडी फळं वगैरे खरेदी करून रूमवरती आलो. उद्या दिवसभर फिरायचं आहे.

**१८ जून २०११ शनिवार**

आठ वाजता दोघं उठले. मी व प्रेरणा सवयीप्रमाणे अगोदरच उठून व आवरून बसलो होतो. नऊ वाजता निघालो. सबवे मधून नाष्टा बांधून घेऊन ग्रांड कॅनियनकडे निघालो. वाटेत एक दोन ठिकाणी थांबून दोनेक तासात जाऊन पोचलो. ॲरिझोना व लगतचा नेवाडा राज्याचा हा सगळा रखरखाटाचा असा वाळवंटी प्रदेशच आहे. अगदी जवळ येईतो काही कल्पनासुद्धा येत नाही. इतकी वैराण माळरानं व बोडके डोंगर आहेत. गरमीपण अगदी वाळवंटीच. वारं मात्र इतकं भन्नाट की सत्तरच्या वेगानं धावणारी गाडी किंचितशी बाजूलाच ढकलली जात होती.



हॉटेल दुपारी चारनंतरच मिळणार असल्यानं लगेचच भटकायचं ठरवलं. मध्यावरच्या ग्रँड कॅनियन व्हिजीटर सेंटर मध्ये पोहोचलो. ऋचानं माहितीपत्रकं व नकाशे घेतले. दीड दिवसात वरच्या पठारावरून फिरून बहुतेक सर्व महत्वाची स्थळं पाहता येतील असं समजलं. तिथं सुसज्ज अश्या प्रेक्षागृहात एक दहा मिनिटांची फिल्म पण बघितली. त्यावरून एकूण कल्पना आली. तिथेच मागच्या बाजूला बरेच पॉईंटस होते. त्या जागी गेलो. वर सूर्य डोक्यावर आला होता. चांगलेच भाजून निघत होतो. इथल्या झऱ्यांचंच थंडगार पाणी सगळीकडे भरून घ्यायची सोय जागोजागी केलेली आहे. बाटल्या भरून घेऊन व डोकी

झाकून भटकलो. विक्रमनं एक फेरी मारून जे काय बघायचं ते पाहून घेतलं व गाडीत जाऊन बसला. मग सहल आटोपेतो तो काही आमच्या बरोबर फिरायच्या फंदात पडला नाही. हया अतिभव्य दरीचं (कॅनियन) पहिलं दर्शन अगदी मंत्रमुग्ध करणारंच आहे. दोनशे मैल लांबवर वाहत्या व खळाळत्या कोलाराडो नदीच्या दोन्ही तीरांवर उभ्या पंचवीसेक मैल रूंद अश्या महाकाय पर्वत रांगा असून दरीची खोली सुमारे मैलभर आहे. नजर पोहोचेल तिथवर छोटे मोठे पर्वत आहेत. त्यांच्या तळापासून ते माथ्यापर्यंत विविध रंगांच्या खडकांचे थर पहायला मिळतात.






झाडी अशी नसल्यानं हे उघडे बोडके डोंगर ध्यानस्थ योगी पुरूषांसारखेच भासतात. दोन अब्ज वर्षांपूर्वीच्या ज्वालामुखीच्या उद्रेकानंतर हे अपूर्व असं अदभुत निर्माण व्हायला सुरूवात झाली. अगदी दीडशे वर्षांपर्यंत साहसवीर व काटक असे निसर्गप्रेमी मित्रच येथे येत असत. ते सुद्धा पायी किंवा खेचरावरून वा घोडागाडीनंच. १९२० नंतर हळूहळू बदल होत गेले असून गेली अनेक वर्षे हजारोंच्या संख्येने सर्वसामान्य नागरिक येऊन इथं आनंद घेऊ लागले आहेत. सुबक रस्ते, आतून फिरवणारी मोफत बस, जागोजागी माहितीपूर्ण फलक हयामुळे खूप सोय झाली आहे.




तासभर हया परिसरात फिरून मग मोटारीनं डेझर्ट व्ह्यू नावाच्या पंचवीस मैलावरच्या ठिकाणी गेलो. उन चांगलंच तापलेलं होतं. विक्रम आइस्क्रिम घेऊन गाडीतच बसून राहिला. आम्ही तिघं फिरलो. १९३० च्या आसपास उभारलेल्या एका वॉच टॉवरच्या वरच्या मजल्यावरून खाली दिसणारं वाळवंटाचं विहंगम दर्शन घेतलं. फोटो वगैरे घेतले. खूप मजा आली. मग छानपैकी गार आइस्क्रिम घेऊन माघारी परतलो. व्हिलेज पार्क नावाच्या जागी पर्यटकांच्या राहण्याची छान सोय केलेली आहे. त्या परिसरातल्या मार्विक लॉज हया जागी जाऊन सहा महिने आधी राखून ठेवलेली खोली ताब्यात घेतली. डबल बेडची छान जागा आहे. सामान टाकलं व जरा आवरून ताजे होऊन तिघे निघालो. विक्रम थकला व कंटाळला असल्याने लगेचच झोपी गेला. इथं ठराविक जागी



जाण्यासाठी सेंटरनं मोफत बसेस ठेवल्या आहेत व त्या मार्गावरती मोटार गाडयांना परवानगी नाहीच.अश्या रेड लाईनवरची बस घेऊन निघालो ते पार टोकापर्यंत जाऊन आलो.वाटेतली स्थळं व पॉईंटस बसमधूनच बघितली.




दहा मिनिटं हर्मिट रेस्ट हया शेवटच्या थांब्यावर उतरून त्याच बसनं माघारी आलो.वाटेवरच्या मोहावे पॉईंट पाशी सूर्यास्त पहायला थांबलो.बरीच मंदळी जमलेली होती.फारच सुंदर देखावा दिसत होता.तिथं काही भारतीय वंशाची मुलं भेटली.त्यांच्याशी थोडया गप्पा मारल्या.



पहाटे सूर्योदय पहायचा असं ठरवूनच बसनं घरी परतलो.विक्रम उठून तयार झाला होता.सगळे तिथल्या रेस्टॉरंटला गेलो.मेक्सिकन पद्धतीचं टोफू सूप मी घेतलं तर विक्रमनं पिझ्झा.मस्त जेवण झाल्यावर बाहेर पडत असताना समोरून एक भारतीय चौकोनी कुटुंब येताना दिसलं.नवरा बायको मुलगा व मुलगी.त्यातल्या पुरूषाचं माझ्याकडं लक्ष गेलं व ओळखीचं हसल्यावर थांबलो.तो मुलतानीकडं काम करणारा प्रसेंजित गुप्ताशर्मा होता.त्याची बायको पण तेवढयात आली.तिचा चेहेरा पाहून ओळख पटली.ती बायॉलॉजी विभागात होती.आता दोघंही विस्कॉन्सिन युनिवर्सिटीत काम करतात.मुलं पण कॉलेजात शिकताहेत.अचानक गाठ पडल्यानं मग थोडया चौकश्या व परिचयाचा कार्यक्रम झाल्यावरती पांगलो.रूमवर आलो.विक्रमची

छान झोप झालेली असल्यानं तो हॉटेलच्या लॉबीमध्ये त्याचा लॅपटॉप घेऊन गेला. कारण तिथंच वाय फाय होतं. तासाभरानं तो परतला. तोवर आम्ही झोपण्याच्या बेतात होतो.

**१९ जून २०११ रविवार**

पहाटेच तिघं उठलो व साडेचार वाजताच गाडी काढून सूर्योदय बघायला निघालो. पॉईंटवर पोहोचलो व समोर सूर्यबिंब डोंगराच्या आडून वर आलेलं बघायला मिळालं. दोन मिनिटं उशीरच झाला होता. मोजकीच माणसं आलेली होती. कोवळं उन पडलेले डोंगर फारच छान दिसत होते. तिथं तासभर बसून दरीच्या तळापर्यंत पोहोचणारं उन पहात बसलो. फोटो काढले.








व्हिडियो फिल्मस घेतल्या. मग व्हिजिटर्स सेंटरला जाऊन गाडी पार्क केली. ऑरेंज लाईनची बस पकडून पंधरा मिनिटांच्या प्रवासानंतर 'याकी पॉईंट'ला आलो. आता सूर्य चांगलाच वर आला होता. मग तिथून दुसरी बस पकडून यावापाई जिऑलॉजी म्युझियम बघायला गेलो. तिथं चार पाच पॉईंटस आहेत. ते पाहून होईतो आठ वाजता म्युझियम उघडलंच. दारापाशीच एक हौशी माणूस दुर्बिण लावून बसला होता. त्यानं बोलावून सूर्यबिंब दाखवलं. त्यावर एक काळा डाग पण दिसत होता. त्याच्याशी थोडया गप्पा केल्या. त्यांचं हौशी खगोल मंडळ असून दिवसा सूर्य व रात्री व्हिजिटर्स सेंटरपाशी तिथं फार छान माहिती एका जागी संकलित करून ठेवलेली आहे. दुर्बिणी पण आहेत. इथून दिसणा-या डोंगरांची नावं व मातीचं मॉडेल पण आहे. त्यात विष्णू टेंपल व शिवा टेंपल तसेच विष्णू प्लाटू अशी नावं पण दिसली. त्या परिसरात फिरेतो वेळ कसा गेला समजलं पण नाही. सुमारे पाच तास ग्रॅंड कॅनियन मधला हा निसर्गोत्सव डोळे भरून पहात होतो. मग सेंटरला येऊन गाडी घेऊन लॉजवर आलो.




तोवर विक्रमचा दोनदा फोन येऊन गेलाच. त्याला कँटिनमध्ये गाठलं. अंडापोळीचा मजबूत नाष्टा झाला. दोघांनी पण तो संपवायला मला हातभार लावला. टंपरभर कॉफी घेऊन रूमवर आलो. तोवर प्रेरणाचं आवरून झालेलं होतं. मग आंघोळी उरकून बॅगा भरून अकराच्या सुमारास निघालो. गाडीत इधन भरून परतीच्या प्रवासाला लागलो. आजपण हवा एकदम मस्त छान होती. एकच्या सुमारास फ्लॅगस्टाफला पोहोचलो. परवाच्या इंडियन कुझिन मध्ये जेवायला गेलो. पण बुफे पद्धतीचं असल्यानं बेत रहित केला व सरळ एअरपोर्टवरती आलो. गाडी परत केली. लॉबीमध्ये नेटवर मेल चेक करत व डायरी लिहीत बसलो. मला भूक नव्हतीच. तिघांनी तिथं बर्गर वगैरे घेऊन खाल्लं. ठीक तीन वाजता छोटया विमानानं निघालो.



निघतानाच पायलटनं ही बंपी राईड असणार असल्याचं सांगितलं होतं. त्याचा चांगलाच अनुभव वर उंच जात असताना स्थिर झाल्यावरती व उतरतांना आलाच. एकदा तर विमान वरखाली होऊन खूपच हलत होतं. त्यामुळं ऋचाला मळमळायला लागलं. त्यातून आज पहाटेपासूनच जागी. रात्री झोप पण अपुरी व दिवसभर उन्हात ड्रायविंग. विमानात हादरे बसत असल्यानं एअर होस्टेसनं पाणी सुद्धा दिलं नाही. उतरताना मी ग्लासभर पाणी मागून घेतलं व खाली उतरल्यावर तिला दिलं. इथं अगदी दिल्लीची आठवण यावी इतका उकाडा होता. कनेटिंग फ्लाईट पकडायची घाई असल्यानं मग विक्रम व आम्ही निरोप घेऊन पांगलो. आमच्या गेटवर येईतो बोर्डिंगला सुरूवात पण झालेली होती. साडेसात वाजता सिॲटलला पोचलो. फ्लाईटमध्ये तिला काहीच त्रास झाला नाही. पण अगदी मलूल झाली होती. विनीत घ्यायला आलेला होता. घरी आलो. मी पण पार दमून गेलो होतो. विनीतं वरण भात व भाजी बनवून ठेवली होती. मस्त जेवलो. ऋचाला जराशी तरतरी आली. दहा वाजताच झोपी गेलो. एकूण ट्रिप ग्रँडच झाली.

**२० जून २०११ सोमवार**

शांत झोप लागली. उठावंसं वाटतच नव्हतं. रोजच्यापेक्षा थोडी उशीराच जाग आली. ऋचा गाडीनं विनीतला सोडून आली. आज दिवसभर घरात बसूनच आराम केला. प्रवासातले कपडे वगैरे धुण्याचा कार्यक्रम झाला. स्काईपवरून औरंगाबादकरांशी ऋचा व प्रेरणाच्या खूप गप्पा झाल्या. दुपारी पोळी भाजीचं साधंच जेवण जेवलो. सायंकाळी गाडी घेऊन विनीतला घ्यायला गेलो. तिथून बाजारात दोन दुकानांत जाऊन सामान घेऊन आलो. पुष्कळ भारतीय माणसं दिसत होती. समामीश तळयाच्या काठावर फिरायला गेलो. खूप उन पडलेलं होतं. तासभर चक्कर मारली. रात्री मॅगी भाजीचं गरमागरम जेवण जेवलो. अकरा वाजेपर्यंत पुराणं व धर्म आणि त्यातल्या कथा वगैरे अनेक विषयांवरती गप्पा मारल्या. मग झोपलो. उद्या २१ जून. मोठा दिवस व छोटी रात्र.

**२१ जून २०११ मंगळवार**

आज पण उशीरानंच उठलो. विनीत नऊ वाजता कामावर गेला. आज सर्वच मंडळी स्काईपवरती आली होती. त्यामुळे अर्धा तास आजी, मामा, मामी, ज्योती मावशी, संविद व मिहीर हयांच्या शी मनसोक्त गप्पा झाल्या. सव्वा दहा वाजता सूर्य पृथ्वीच्या सगळयात जवळ येणार असल्यानं प्रखर उन पडणार होतं. ही माहिती सकाळीच नेटवर वाचली होती. आम्ही दोघं खाली दोन तास फिरून आलो. प्रेरणाला रस्त्यावरच्या फुलांचे फोटो घ्यायचे होते. ते घेऊन व बागेत दोन चकरा मारून परतलो. दुपारी जेवून थोडा आराम केला. आज मोहीत चिटणीसांचा फोन आला होता. शनिवारच्या कार्यक्रमाच्या तयारीला लागायचं आहे. भीमसेन जोशी हयांचा पुतण्या इथं राहतो. त्याला भेटायचं ठरवताहेत. तो शनिवारच्या कार्यक्रमाला येणार आहे. शुक्रवारी रमेश

गंगौलींकडे भीमसेनजींवरचा कार्यक्रम आहे. तिथं पण भेटू शकतो असं सांगितलं. रॉब मिलीसची मेल आली आहे. तो बायकोला घेऊन दोन्ही कार्यक्रमांना येणार असून सर्वांना त्याच्या घरी जेवायला बोलावले आहे. पुढच्या दहा दिवसात इथं पुष्कळ ओळखी होण्याची चिन्हं दिसताहेत. विनीत कामावरून आल्यावर संध्याकाळी सगळे गाडीनं निघालो. डाऊनटाऊन मध्ये चायना मार्केटमध्ये एक चक्कर मारून व सामान खरेदी केलं. मग इथल्या मरीन ड्राइव्ह सारख्या सागरकिनारी गेलो. आठ वाजून गेले होते. प्रखर सूर्य प्रकाश होता. आज उत्तरायणाचा अखेरचा दिवस. त्यामुळं उशीरापार्यंत उजेड होता. तिथं बाकावर बसून बरोबर नेलेली खिचडी कोशिंबीर व पापड असं छान जेवलो. समोर सूर्यास्ताचा सोहोळा डोळे भरून बघितला व कॅमे-यात बंद पण करून ठेवला.







मग अंधार पडल्यावर निघालो. शहरातल्या ऊंच जागी जाऊन रात्रीच्या प्रकाशात न्हाऊन निघणारं शहर बघितलं.





आइस्क्रिम खायची इच्छा झाली होती. पण दोन चार ठिकाणं फिरूनही कुठंच मिळालं नाही. मग घरी येऊन उशीरानं झोपलो.

**२२ जून २०११ बुधवार**

आज उन व पावसाच्या हुलकावणीचा बाहेर खेळ चालू होता. म्हणजे आभाळ भरून येत होतं पण पाऊस पडत नव्हता. पण बाहेर बेताचंच गार होतं. दोघं खाली जाऊन बागेत पाच चकरा मारून आलो. तर ऋचा जिममध्ये जाऊन आली. जेवून दुपारी आराम करून मग साडेतीन वाजता निघालो. पंचवीसेक मैलांवरती 'सीडर फॉल्स' नावाची एक जागा आहे. तिथं विनीतनं सुचवल्यावरून जाऊन आलो. ऋचा पण प्रथमच येत होती. सीडर नदीच्या काठावर प्राचीन काळापासून आदिवासी रहात होते. आधुनिक काळात १८४० पासून इथं व्यापार व मालवाहतूकीची साधनं होती. सिॲटल शहरातल्या मोठया आगीनंतर इथे वीजनिर्मिती केंद्र उभारण्यात आलं व १९६० पर्यंत रेलवे मार्ग पण होता. आता तिथं 'सीडर वॉटर एज्युकेशन सेंटर' उभारण्यात आलं असून छान प्रदर्शन मांडलेलं आहे.



बाहेरच्या भागात जंगलाचा सीन मांडला असून त्यात वेगवेगळया ठिकाणी छोटे मोठे ड्रम्स मांडले आहेत . त्यावर नळीनं पाणी पडत असतं . त्याचा प्रोग्राम व सीक्वेन्स ठरलेला आहे . त्यामुळं जुन्या काळातल्या जंगलवासियांच्या कम्यनिकेशनचा व संगीताचा थोडा अनुभव घेता येतो . मग तिथल्या नदीच्या काठी एक चक्कर मारून आलो . फारच छान जागा आहे . परत येताना नॉर्थ बेंड हया जागी थांबलो . इथं डोंगराच्या कुशीत गोलाकार शॉपिंग कॉम्पलेक्स वसलेलं आहे .



अगदी उत्तराखंड हिमालयात जाऊन आल्याचं समाधान मिळालं . तिथं एक चक्कर मारून आइस्क्रिम वगैरे खाऊन आलो . विनीत येऊन स्वयंपाकाच्या तयारीला लागला होता . रात्री मस्तपैकी पावभाजीचा बेत होता . जेवून बराच वेळ वाचत मेलना उत्तर वगैरे लिहित बसलो . खूप उशीरा झोपलो .

**२३ जून २०११ गुरूवार**

आज ऋचा व विनीत बराच काळ झोपूनच होते . शेवटी प्रेरणानं साडेदहा वाजता हाक मारून उठवलं . ऋचा त्याला गाडीनं सोडून आली . सकाळी गार होतं व थोडासा पाऊस पण पडत होता . माफक गरम कपडे घालून दोघे खाली फिरायला गेलो . परत येईतो चक्क उन पडलं होतं . सायंकाळी विनीतला ऑफिसमधून घेऊन गाडीनं दोन चार ठिकाणी खरेदीसाठी फिरून आलो .



रेडमंड लायब्ररीत जाऊन पुस्तकं परत करून व नवीन घेऊन आलो. शनिवारच्या कार्यक्रमाची रूम बघितली. रात्री खिचडी खाऊन उशीरापर्यंत काम करत बसलो. उद्या व परवाच्या कार्यक्रमांची तयारी करत बसलो. हया शहरात बरीच भारतीय (इथल्या मुलांच्या भाषेत 'देशी') माणसं दिसतात. महेश देसाईचा फोन आला होता. उद्या गंगौलींच्याकडे येणार आहे म्हणाला.

**२४ जून २०११ शुक्रवार**

विनीतनं ऑर्डर केलेली लॅपटॉपची बॅटरी आली. तिच्यामुळं आता चार तास काम करता येईल. आज पोर्टेबल डी. व्ही. डी. प्लेअर व फोटो फ्रेम ऑर्डर केली आहे. संध्याकाळी गंगौलींकडच्या कार्यक्रमाची तयारी करत बसलो. साडेअकराच्या सुमारास खाली एक चक्कर मारून आलो. दुपारी जेवून थोडा आराम केला. साडेपाच वाजता निघालो. विनीतला ऑफिसात घ्यायला गेलो. मग मला रमेश गंगौलींच्याकडं सोडून तिघंजण वॉलमार्टला खरेदीसाठी गेले. मी तासभर अगोदरच पोहोचल्यानं मग रमेशजींशी गप्पा मारत बसलो. त्यांच्याकडे भीमसेनजी शोभा गुर्टू सहकुटुंब येऊन राहिलेले होते. अनेक कलाकारांच्या साधेपणाच्या आठवणी त्यांनी सांगितल्या.



तोवर देवो आलाच. मला एल. सी. डी. प्रोजक्टर कसा वापरायचा ते त्यानं दाखवलं. पावणेआठ वाजता कार्यक्रम सुरू केला. दहाच लोक जमले होते. पण चोखंदळ होते. महेश देसाई पण आला होता. मग वरच्या मजल्यावर शांताजींनी उपमा बनवला होता. त्याचा आस्वाद घेत गप्पा मारत बसलो. रॉब पण आला होता. त्याला पण कार्यक्रम फार आवडला. उद्या बायकोला घेऊन येतो म्हणाला. महेशची मुलगी त्याला घ्यायला आली. मला सरदेसाईंनी सोडलं. वाटेत खूप गप्पा मारल्या. साडेअकरा वाजून गेले होते. ही मंडळी खरेदी करून येईतो साडेबारा वाजून गेले होते. पुष्कळच सामान घेऊन आले होते. ऊशीरानं झोपलो.

**२५ जून २०११ शनिवार**

सुटी असल्यानं व काल रात्री खूप उशीरानं झोपल्यानं उशीराच जाग आली. बाहेर गारच होतं. ऋचा व विनीत जिममध्ये जाऊन आले. तोवर मी छोटी डुलकी काढली. मग एक वाजता जेवून सगळे निघालो ते दीडच्या सुमारास रेडमण्ड लायब्ररीत पोचलो. मंडळी जमून साऊंड सिस्टीम वगैरे जोडत होती. पटकन बरोबर नेलेला प्रोजेक्टर व लॅपटॉप जोडला व बरोबर पावणे दोन वाजता कार्यक्रम सुरू करून पावणेपाच वाजता संपवला.





त्यात 'हिंग्लिश गाणी' सव्वा तास व भीमसेन जोशींच्या श्रद्धांजलीवरचा कार्यक्रम सव्वा तास झाला. पन्नासच्यावर श्रोते जमले होते. मध्ये पन्हं व कुकीजचा आस्वाद घेऊन झाला. मध्यंतरानंतर भीमसेनजींचा संजय जोशी हा पुतण्या मराठी, कानडी व इंग्रजीतून काकांविषयी बोलला. तो इथं स्थायिक झाला असून त्याला संयोजकांनी शोधून काढून मुद्दाम बोलावलं होतं. आधीचा 'हिंदी चित्रपट गीतांवरचा पाश्चिमात्य संगीताचा प्रभाव' हा कार्यक्रम फारच रंगला होता. तो ठसा कायम असताना हा पुढचा कार्य क्रम रंगवायचा होता. पण पुतण्याच्या भाषणातच सूत्र सापडलं व भीमसेनजींच्या चित्रपटगीतांतून सुरू करून नाट्यगीत, भावगीत, भजन, अभंग व भैरवी ठुमरी हा 'प्रवाद' पुरूषाचा प्रवास मांडला. विशेष म्हणजे तो सर्वांना अतिशय आवडला. सॅन होजे प्रमाणेच इथंपण आलेला प्रत्येकजण अगदी शेवटपर्यंत बांधून ठेवल्या सारखा बसलेला होता. अगदी नव्या पिढीतले विनीत व ऋचापण तीन तास एके ठिकाणी बसून ऐकत होते. अगदी वेळेत संपवल्यामुळे संयोजकांच्या मनावरचा ताण पण बराचसा हलका झाला. मग मला शाल श्रीफळ व मानधनाचं पाकीट देऊन सत्कार झाला. शिवाय सोसायटीसाठी देणगीचं पण आवाहन करण्यात आलं. त्यातही पुष्कळच नोटा जमा झाल्या. जयंत जोशी व त्यांची अमेरिकन बायको हया दोघांनीही आवर्जून येऊन भेट घेतली. दोन्हीही सादरीकरणं अनोखी व नावीन्यपूर्ण झाली व आवडली म्हणाले. मराठी मंडळींनी तर खूपच प्रशंसा केली. विशेष म्हणजे रॉब व त्याची बायको दोघेही वेळेवर येऊन शेवटपर्यंत थांबले होते. मराठीतून पुष्कळसं निवेदन असूनही तिला दोन्ही कार्य क्रम आवडले. ती त्याच्या मानाने फारच बुटकी असून बरीचशी अविनाशच्या बायकोसारखी मेघाची आठवण करून देणारी वाटली. सोमवारी त्यांच्याकडे जेवायला जावं असा बेत ठरतो आहे. आज निघण्यापूर्वीच बेन लायमन हया फिलाडेल्फियातल्या एका संग्राहकाकडून एका बॉक्समध्ये उदयशंकरांच्या ७८ गतीच्या रेकॉर्डसचा संच आला होता. तो आल्बम घेऊनच कार्यक्रमाला आलो व आल्याआल्या रॉबला दिला. त्याच्या सेटमध्ये नसलेली ध्वनिमुद्रिका मिळाल्यानं तो हरखूनच गेलेला होता. सायंकाळी सिॲटल महाराष्ट्र मंडळाच्या कमिटी मेंबर्सच्या डिनर पार्टीकरिता मोहितच्या घरी जायचं ठरलं आहे. रेडमण्डच्या बाजारात एक चक्कर मारली. मुंबईतल्या काळा घोडा फेस्टिवलची आठवण यावी असा माहौल दोन चार चौकांत मांडलेला होता. तिथं कॉफी घेऊन व चक्कर मारून फिरलो. पाचच्या सुमारास घरी आलो. मी तासभर झोप काढली. मग साडेसात वाजता निघालो. बोथेल परिसरातल्या मोहित चिटणीसांच्या घरी पोहोचेतो सव्वा आठ वाजलेच. मंडळाचे कमिटी मेंबर्स व त्यांचे कुटुंबिय मिळून चाळीसेक मंडळी तरी जमलेली होती. पेयपान सुरू झालेलं होतं. बरीचशी मंडळी फळांचे रसच पीत होती. गप्पा व चढलेल्या आवाजांमुळं मंडळी जोरानं बोलत होती. आज आम्हीच केंद्रस्थानी असल्यानं मी प्रत्येकाशी बोललो.



सर्वांनाच कार्यक्रम अतिशय आवडला. सोसायटीची पण माहिती अनेकांनी विचारून  घेतली. भोपटकर आजी बडोद्याच्या असून अगदी विनीतच्या आजीची आठवण करून देणा-या वाटल्या. सुबोध कीर्तने व काल गंगौलींच्याकडं ओळख झालेल्या संजय करंडेंशी पण बोललो. खूपच गरम होत असल्यानं मग जरा बाहेर लॉनवर पण फिरून आलो. नऊ वाजता जेवायला बसलो. चिकन होतं. शाकाहारी पदार्थ पुलाव व मसूर डाल फारच छान बनविलेली होती. पोटभर जेवलो. २०१३ च्या बृहन महाराष्ट्र मंडळाच्या अधिवेशनाकरिता तुमच्या कार्यक्रमाविषयी बोलतो व नाव सुचवितो असं मोहित चिटणीस म्हणाले. मग दहा वाजता निघून साडेअकरा वाजता घरी आलो. उद्या रेनियर नॅशनल पार्कला जायचं असल्यानं लगेचच झोपी गेलो.

**२६ जून २०११ रविवार**

माऊंट रेनियरला जाण्यासाठी आठच्या सुमारास निघालो. कालच्या पार्टीतले मसालेदार पदार्थ खाऊन माझं पोट जरासं जड झालेलं होतं तर ऋचाचं दुखत होतं. तरीपण रेमाटून ती गाडी चालवायला बसलीच. माऊंट रेनियरचा रस्ता पण घनदाट झाडीतून जात होता. शंभरेक मैलांवरती आहे. वाटेत एके ठिकाणी थांबून बेरीज घेतल्या. अर्धा तासभर आम्ही तिघेही छान झोपलो होतो तर ऋचा एकटी शांतपणे गाडी चालवीत होती. पर्वत जसजसा जवळ येत चालला तसं थांबून फोटो काढत पुढं निघालो.



पाच हजार फुटांवरचं गोठलेलं तळं बघितलं. साडेपाच हजार फुटांवरच्या पॅराडाइज पॉईंटपाशी पोचलो तेव्हा बारा वाजून गेले होते. आज स्वच्छ सूर्यप्रकाश, मोकळी हवा व रविवारची सुटी असल्यानं खूपच गर्दी झाली होती. बर्फाच्छादित शुभ्र रेनियर पर्वत फारच देखणा दिसत होता. त्यावर लहानथोर मंडळी मस्तपैकी फिरत होती.



पार्किंगसाठी विनीतला लोअर लेव्हलला पार खाली जावं लागलं. मग माहिती केंद्रात गेलो. दहा मिनिटांची फिल्म बघितली. शेजारच्या उपहारगृहातनं पिझ्झा आणून दोघांनी खाल्ला. मी फक्त कॉफी प्यालो. प्रेरणातर दिवसभर फळांवरच होती. दोन ते साडेचार हे तिघे रेंजर बरोबर तीन मैलांच्या परिसर भ्रमणासाठी जाऊन आले. मी इथल्याच दालनांतली प्रदर्शनं पहात वेळ काढला. दादरची मराठी मंडळी भेटली. प्रेरणाच्या शाळेत त्यातल्या एक बाई जातात. त्यांनीच ओळख दिली. पाच वाजता केक खाऊन निघालो. कारण तिथलं कॉफी मशीन बंद पडलं होतं. सेंटरच्या मागच्या रस्त्यावरून फुटपाथवरून चालत कारपार्ककडे निघालो. डाव्या हाताला बर्फाचं छोटंसं टेकाड तयार झालेलं होतं. माझं सहज वर लक्ष गेलं तो वर एक मध्यम आकाराचं काळंशार अस्वलाचं पिल्लू. खालीच उतरत होतं. मी इशारा करून थांबलो. प्रेरणाला कॅमेरा दिला व माझा मोबाईल काढला. ऋचा रेंजरला सांगायला मागं जलद निघून गेली. तेवढयात चाहूल लागल्यानं ते सावकाश वर निघून गेलं. मी पटदिशी व्हिडियो काढली तर प्रेरणानं फोटो.



रस्त्याच्या पलिकडं काही माणसं शांतपणे हे पहात उभी होती. तेवढयात रेंजर गाडी घेऊन आला व थांबून त्यानं आम्हाला विचारलं पण. मग निघालो ते आठ वाजता घरी परतलो. आता आभाळ भरून आलं होतं. पण दूरवर रैनर चमकताना मस्त दिसत होता. एकूण हया सहलीत हवामानानं चांगलीच साथ दिली म्हणायचं. बरोबर नेलेली भाजी पोळी घरी आल्यावरती खाल्ली. सगळे जण खूप दमलो होतो. पण आज अस्वल फार जवळून पहायला मिळालं हे विशेष व अमेरिकावारीचा विशेष. उद्या रॉबनं जेवायला बोलावलं आहे.

**२७ जून २०११ सोमवार**

कालच्या दमणुकीमुळं आज दिवसभर तसा आरामच केला. आम्ही दोघं पार्कमध्ये पाच चकरा मारून आलो. दुपारी पण छान झोप काढली. कालची व्हिडियो व फोटो रेंगरला मेलनं पाठवून दिले. त्याची आभाराची मेल पण दोनेक तासात आली. सायंकाळी विनीतला ऑफिसातनं घेऊन निघालो ते बरोबर सात वाजता रॉबच्या घरी पोहोचलो. हयाच परिसरात गेल्या वर्षी ऋचा तिच्या जी. आर. ई. च्या गणिताच्या क्लासला विनीतबरोबर येत असे. रॉब व ख्रिस्टीन वाटच पहात होते. गेल्या गेल्या अगदी आपलेपणाने ती तिघांना घेऊन मागे बागेत गेली. तोवर मी रॉबपाशी बसून ऑडॅसिटीच्या पुष्कळ न उमजलेल्या गोष्टी समजावून घेत बसलो. मँगो ज्यूस घेऊन टॉरटिला खात बसलो. खूप वेगवेगळया विषयांवरील गप्पा मारल्या. तिनं छान लेंटिल सूप व कलिंगडाची मिंट घालून कोशिंबीर बनवली होती. मस्तपैकी जेवलो. त्यानं संगीत दिलेल्या दोन सी. डी. ज भेट दिल्या. एकीवर वाजपेयींचा चेहेरा दिसल्यानं विचारलं. २००८ साली तो भारतात चेन्नईला गेलेला असताना एका भिंतीवरील पेंटिंगवरचा रंग उडालेला दिसला. त्याचा फोटो काढून त्यानं उपयोग करून घेतला. हे भारताचे पंतप्रधान होते हेच त्याला माहित नव्हते. एकूण त्याच्या कल्पकतेची मजा वाटली. मग साडेअकरा वाजता झोपलो.

**२८ जून २०११ मंगळवार**

आज पण उन पावसाचा खेळ सुरू होता. बारा वाजता खाली जाऊन एक चक्कर मारून आलो. सायंकाळी विनीतला ऑफिसातून घेऊन बेलेव्ह्यूच्या डाऊन टाऊन मध्ये विनीतसाठी एक अपार्टमेंट बघून आलो. दोन चार ठिकाणी सामान खरेदीसाठी जाऊन नऊ वाजता घरी आलो. खिचडी खाऊन झोपलो. उद्याला विक्रम यायचा आहे. आता परत जायचे वेध लागले आहेत. खूप छान सहल झाली व नवीन ओळखीपण झाल्या. एकूणात पहिलीच अमेरिका सहल फारच छान झाली.

**२९ जून २०११ बुधवार**

आज दुपारी शहरातल्या प्राणी संग्रहालयात म्हणजे झू मध्ये जायचं ठरवलं . त्यामुळे सकाळी कुठंही फिरायला गेलो नाही . जेवून आम्ही तिघं एकच्या सुमारास युनिवर्सिटीच्या परिसरात असलेल्या मोठया प्राणी संग्रहालयात आलो . सुमारे चार तास पायीच फिरत होतो . शेवटी अगदी पाय दुखायला लागले . निघतेवेळी पावसाची भुरभूर होती . पण इथं मात्र हवा ढगाळ व कुंद होती . परत निघताना चक्क उन पडलं होतं . सुरूवातीला पेंग्विन पक्ष्यांच्या कृत्रिम तळयातल्या स्वागतानं झाली . मग विविध देशांतले व प्रदेशांतले पशु व पक्षी पहात निघालो . पक्षी पिंजरा वाटू नये इतक्या कलात्मकतेने मांडलेले होते .



वाघ, सिंह व अस्वलासारखे प्राणी तर अगदी नैसर्गिक जंगलात मोकळे सोडलेले होते . जागोजागी प्रेक्षकांसाठी सुंदर गॅल-या उभारलेल्या होत्या . आफ्रिकन, युरोपियन, एशियन, ऑस्ट्रेलियन व अगदी टुंड्रा प्रदेशातले प्राणी पण इथं पहावयास मिळाले . खूप मजा आली . घरातून निघताना जावं की न जावं अशा द्विधा मनःस्थितीत होतो . मात्र परत येताना खूप छान संग्रहालय पहावयास मिळाल्याचा आनंद झाला . ऋचानं पण प्रथमच बघितलं . प्रेरणानं तीनशेच्या वर फोटो काढले . साडेसहा वाजता परतलो . थोडा आराम केला . विनीत व ऋचा बाहेर गेले ते रात्री विक्रमला एअरपोर्टवरून घेऊन आले . गप्पा मारत जेवलो व उशीरानं झोपलो . उद्या संजीव कारंडेबरोबर जेवायला जायचं आहे . त्याची रमेश गंगोलींच्या कडं ओळख झाली होती . मोहीत चिटणीसकडं भेट पण झाली होती व त्यानं 'ॲन ऑटोबायोग्राफी ऑफ अ योगी' हे पुस्तक पण भेट दिलं होतं . माझ्या सादरीकरणावरती सुबोध कीर्तने प्रमाणे हा सुद्धा प्रभावित झाला असून त्याबाबत माझ्याशी बोलायचं आहे असं मेलवरून म्हणाला .

**३० जून २०११ गुरूवार**

आज ऋचाची ॲलर्जी टेस्ट असल्यानं ती व विनीत आठ वाजताच गेले . तो मग ऑफिसात गेला तर ऋचा बाराच्या सुमारास परतली . विक्रम आराम करत होता . उठून जिमला जाऊन आला . दीडच्या सुमारास संजीव कारंडे आले . त्यांच्या बरोबर जवळच्याच एका चायनीज रेस्टॉरंट मध्ये गेलो . ते नेहमी इथं येतात असं तिथल्या मॅनेजरशी बोलताना जाणवलं . चायनीज फ्राईड राईस मी मागविला व त्यांनी चिकनचा काही प्रकार . सोबत गरमागरम कोरा चहा होताच . छानपैकी जेवत व गप्पा मारत बसलो व जेवलो . हे मूळचे मुंबईतले . इथं येऊनपण तीसेक वर्ष झालेले . लॉस एंजलिस, हॉलिवुड, बोइंग, मायक्रोसॉफ्ट मध्ये नोकरी व आता स्वतंत्र कंत्राटं घेऊन कामं करतात . विजया राजाध्यक्षांच्या नात्यातले . तीन वर्षापूर्वीच्या इथल्या मराठी मंडळींच्या अधिवेशनात त्यांचा 'स्त्री-रंग' हा कार्यक्रम आयोजित केला होता . मुंबईत असताना चव्हाण सेंटर मध्ये माझ्या भीमसेनजींच्यावरच्या सादरीकरणाला त्या आलेल्या होत्या व माझं खूप कौतुक पण केलं होतं त्याची आठवण त्यांनी काढली . इथल्या इतरही सांस्कृतिक कार्यक्रमांच्या आयोजनात सहभाग असतो . राहुल देशपांडेला पण इकडे बोलावले होते म्हणाले . अध्यात्ममार्गावरचे काही अनुभव त्यांनी सांगितले . इथं मी सादर केलेल्या दोन कार्यक्रमांची डी . व्ही . डी . ची कॉपी त्यांना दिली . मग माझ्या निवेदनासह हे व इतर कार्यक्रम नेटच्या माध्यमातनं लोकांपर्यंत कसे पोहोचवता येतील यावर तपशीलवार चर्चा केली . एकूण त्यांच्याशी संवाद अपेक्षेपेक्षा छान झाला . मग उरलेला बराचसा भात 'टू गो' बॉक्स मध्ये भरून घेतला . पुन्हा घरापाशी सोडून ते परत गेले . मग लोकसत्ताकरिता लिहिलेले पुस्तक परिक्षण बोजेवारला पाठवून दिलं व जरावेळ डोळे मिटून पडून राहिलो . सायंकाळी विनीतला ऑफिसातनं घेऊन सगळे बेलेव्ह्यू डाऊनटाऊनला आलो . हाफ प्राईस दुकानात चक्कर

मारली.वापरलेली पुस्तकं सी.डी.वगैरे बरंचसं सामान विकायला ठेवलेलं आहे.एल.पी.रेकॉर्डस पण पुष्कळश्या आहेत.मुलांच्या खेळण्यांचं दुकान व एक कप केकचं दुकान बघितलं.डाऊनटाऊन मधल्या एका मॉलमध्ये ऋचासाठी लॅपटॉप बघितला.वाटेत चीझ केक घेऊन मग घरी आलो.गप्पा मारत जेवलो.केक खाल्ला.बराच वेळ वाचत व काम करत बसलो.झोपलो.रात्री संविद व देविदास ऑन लाइन होते.

**१ जुलै २०११ शुक्रवार**

आजचा दिवस आरामाचा होता.सकाळी पार्कमध्ये पाच चकरा मारून आलो.विक्रम बराच उशीरापर्यंत आतमध्ये झोपूनच राहिला होता.जिम मध्ये जाऊन आला.सायंकाळी सगळे कालच्याच मॉलमध्ये गेलो व लॅपटॉप घेऊन आलो.विनीतसाठी काल स्टुडियो बघितला होता.त्या जागेच्या अगदी शेजारी एका थायी हॉटेलात छान जेवून घरी आलो.उशीरा झोपलो.

**२ जुलै २०११ शनिवार**

४ जुलै रोजी अमेरिकेचा स्वातंत्र्य दिन.तो सोमवारी आला.त्यामुळं जिकडे तिकडे सुटीचंच वातावरण आहे.आम्ही दोघं सवयीप्रमाणं लवकर उठलो.बाकीचे सगळे उशीरानं.आज सकाळी इथल्या फार्मर्स मार्केटमध्ये जाऊन यायचं ठरवलं.सावकाश सर्व आवरून बारा वाजता निघालो.वाटेत पोस्टात पत्रं टाकून गॅस स्टेशनवर म्हणजेच पेट्रोल पंपावर गेलो.तिथं गाडीतच बसून बाहेरून मस्त कार वॉशचा अनुभव घेतला.मग जवळच्याच आठवडी बाजारात जाऊन एक फेरफटका मारून आलो.प्रवेशद्वारापाशीच एक पाश्चात्य संगीतरचना सादर करणारा वाद्यवृंद होता.तिथं जरा थांबलो.




संपूर्ण बाजारात एक चक्कर मारून आलो.आसपासच्या शेतकरी मंडळींनी आपला माल अतिशय सुबकपणे जागोजागी मांडून ठेवलेला होता.एकूण मजा आली फिरताना.चेरी घेतल्या.पॉप कॉर्न व आइस्क्रिम खाल्लं.दुपारी जरा आराम केला.सायंकाळी स्पेस नीडलवर जायचं ठरवलं.तिथं पोचलो तो प्रचंड रांगा लागलेल्या.समोरच्या बाजूला एक मेक्सिकन वाद्यवृंद छान गाणी वाजवीत होता.त्यांचं पण मुद्रण केलं.






मग मोनोरेलनं जवळच्याच एका स्टेशनवर जाऊन तिथल्या परिसरात भटकून काही खरेदी करून आलो. तिथंच एका जपानी हॉटेलात जेवलो. छान जेवण झालं. मग पुन्हा मोनोरेलनं स्पेस नीडलपाशी आलो. आता गर्दी खूपच कमी झाली होती. तिसरी खेप होती ही. फोटो काढला.




वर गेलो तो साडे दहा वाजत आलेले होते. रात्रीच्या झगमगाटातलं सिॲटल शहर फारच सुंदर दिसत होतं. पोटं तुडुंब भरलेली होती. आकाशात बरीच विमानं उडताना व उतरताना दिसत होती. अकरा वाजता बंद होत असल्यानं खाली उतरलो. आज विक्रमनं खूप एन्जॉय केलं. त्याची डिग्री, नोकरीचं पत्र ह्याची त्यानं पार्टी दिली.

**३ जुलै २०११ रविवार**

आज चौघेही खाली बागेत फिरून आलो. विनीत ऋचा व प्रेरणा एक ट्रेल घेऊन व रस्ता चुकल्यानं बरंच ॲडव्हेंचर करून परतले. मी बागेत पाच चकरा मारून त्यांची वाट पहात बसलो. मग आम्ही घरी आलो तर ते दोघे पिझ्झा घेऊन आले. दुपारी बॅगा वगैरे भरून टाकल्या. सायंकाळी थोडं सामान खरेदी करून स्नोकाल्मी धबधबा बघायला गेलो. उन्हाच्या योग्य दिशेमुळे छान इंद्रधनुष्य दिसत होतं.



तिथं बराच वेळ फिरून फोटो व व्हिडियो काढले. दहा वाजता घरी येउन डाळ भात खाल्ला. अकरा वाजता झोपलो. उद्या परत जायचं आहे.